नयनताराः तसं काही नाही रे ! ( कपबशा उचलून आत जात ) आलेच हं ! ( जाते. जगदीप अत्यंत अस्वस्थ बसून. किती वाजले ते पाहतो. ते गेले त्या दिशेकडे पाहतो. मग उठतो. पुन्हा बसतो. पुन्हा हातावरच्या घड्याळात पाहतो. पुन्हा ठाकूर गेलेल्या दिशेकडे पाहतो. काही क्षणांनी ठाकूर फ्रेश झालेले येतात - हातात शिलगावलेली सिगरेट. )

ठाकूरः अरे ! तुम्ही काही बोललातच नाहीत वाटतं ! ही कुठं गेली ! ?

जगदीपः ती कपबशा घेऊन गेली आत.

ठाकूरः याचा अर्थ काय असावा बरं ? ( विचार करत राहतात. )

जगदीपः अवघड आहे ! असह्य आहे हे ! नॉर्मल लाईफ असं असूच शकणार नाही तुमच्या अवतीभंवती !

ठाकूरः नॉर्मल लाईफचं पाहू नंतर. पण एक माहिती सांगतो तुम्हाला. माझं न् हिचं लग्न फार झटपट झालं. का माहितीय ? आमच्या चुकीमुळं लग्नाच्या आधीच हिला दिवस गेले म्हणून ! पर्सनल असलं तरी तुम्ही काही परके नाही म्हणून सांगतोय ! हिच्याशी लग्न करून हिला बायको म्हणून सांभाळणं कठीण आहे हे मला माहीत होतं ! पण आय हॅव ॲक्सेप्टेड द चॅलेंज ! शिवाय असं तिला सोडून देणंही चांगलं नव्हतं ! शिवाय तशी ती ॲट्रॅक्टिव्ह आहेच ! आणि शिवाय किरकोळ काहीतरी कुठं काय घडत नाही ? आणि शिवाय दुसऱ्या कुणाची तरी खात्री तरी कोण देऊ शकतं ? आणि शिवाय आपल्या स्वतःच्या सावधपणाबद्दल थोडाफार आत्मविश्वास पाहिजेच ! हे तरी का ? तर समाजासाठी. अहो, समाजाशिवाय जगू शकतो का आपण ? आपण आहे याचा अर्थच समाजही आहे ! ही स्वतः तशी भयंकर सूक्ष्म आहे ! आता मलासुध्दा ते चॅलेंज वाटतं म्हणजे बघा तुम्ही ! पण माझ्या सावधानपणामुळं शेवटी ती हिस्टेरिक वगैरे होऊ नये म्हणजे झालं ! आणि झाली तरी काय करणार ! समाजात राह्यचंय आपल्याला ! अपमान नको ! मग त्यासाठी बायको हिस्टेरिक झाली तरी ते पत्करावं लागणारच ! ज्यांचे संसार सुखाचे होतात ते लोक जनरली सावध नसतात असं एक माझं मत आहे. त्यामुळं फार सुखी संसाराची मी अपेक्षाच ठेवलेली नाही !

जगदीपः मी तर समजत होतो की तुम्हाला बॉक्सिंगची आवड आहे !

ठाकूरः ( हसून ) वॉक्सिंगची आवड आहेच । ती तर फार जुनी आवड आहे माझी ! आणि मला बॉक्सिंगची आवड आहे एवढंच तुम्ही समजत असाल हेही ओळखलं होतं मी !

जगदीपः ते कसं काय ?

ठाकूरः माझ्या इतर गोष्टी कळत चालल्यावर तुमच्यावर होणार परिणाम बघून !

जगदीपः तुमचे सगळे अंदाज खरेच असतात असं वाटतं तुम्हाला ?

ठाकूरः अंदाज हे जोपर्यंत अंदाज असतात तोपर्यंत खरे असण्याचा कुठं प्रश्न येतो ? ती एक शक्यता धरून चालायचं असतं.

जगदीपः कमाल आहे !

ठाकूरः यात तशी कमाल वगैरे नसते. मनाची एखादी क्वालिटी वाढवण्याचा हा एक प्रकार असतो. आता आणखी एक उदाहरणार्थ म्हणजे मी आल्यावर काहीतरी चांगल्या गप्पांत खंड पडल्यासारखं वातावरण तयार झालं ! झालं की नाही ? त्यानंतर आणखी काही झालं. काही बोलणं झालं. अशा प्रत्येक वेळी समांतरपणे एक अंदाजांचीसुध्दा साखळी विणली जात असते माझ्या मनात. त्या साखळीला जर सलगपणा यायला लागला किंवा त्याची एक पध्दतशीर गोष्ट तयार व्हायला लागली तर मात्र या सगळ्या अंदाजांची नीट दखल घ्यावी लागते. काही काही वेळी असं होत नाही. मग ते अंदाजांचे तुकडे वायाही जाऊ शकतात. पण तरीही अंदाज करणं हे एक माझं वैशिष्ट्य आहे.

जगदीपः डेंजरस आहे पण हे ! चुकून जर का गोष्ट तयार झाली तर समोरच्या माणसाची भरलीच मग !

ठाकूरः अहो नम्रपणानंसुध्दा गळा कापणारे लोक मला माहीत आहेत ! ते जास्त डेंजरस असतात !

जगदीपः कठीण आहे. ओळख झाल्याझाल्या एकदम सगळं तिरकसच चालू केलंय तुम्ही !

ठाकूरः ओळख झाल्याझाल्या अशा एकेक गोष्टी स्पष्ट व्हायला लागल्या तर काय करणार ! पण अंदाज कशाला ! माझ्या अंदाजांची टेस्टच घेऊ आपण ! या खोलीत एक टेपिंग मशीन बसवलेलं आहे. पंधरा फुटांच्या परिसरात काहीही आवाज झाले तर ते रेकॉर्ड करतं आणि शांतता असेल तर आपोआप बंद होतं. तुमच्यात झालेलं संभाषण मी तुम्हाला पुन्हा ऐकवू शकतो. ऐकायचंय ?

जगदीपः ( भयंकर नर्व्हस -- ) तुमची इच्छा ! ( नयनतारा येते. ) नयन, तुझं घर म्हणजे एक टेहळणी आणि

तपासणी केंद्रच आहे ! आता आपल्यात झालेलं संभाषण रेकॉर्ड केलेलं ऐकवतो म्हणतायत !

नयनताराः कसलं काय रे ! ऐकवा म्हणावं ! उगीच लोकांना नर्व्हस करायची सवय आहे यांना ! बघितलंय मी !

ठाकूरः पण तुम्ही असे हवालदिल का होताय ? अहो घर आहे हे ! आमचे नातेवाईक येतात, मित्र येतात. त्यांच्यावर असं लक्ष ठेवलं जातंय म्हटलं तर कसं वाटेल त्यांना? घर म्हटल्यावर लोकांनी विश्वासानं यावं आणि मुख्य म्हणजे विश्वासानं जावं हे महत्त्वाचं नाही का ?

जगदीपः ( रिलॅक्स होत, किंचित हसत ) मला मनातनं रागही येत होता आणि तो दाखवणं तर चुकीचं ठरलं असतं. पण लोकांच्या फिरक्या घेण्यात मात्र मानलं पाहिजे तुम्हाला !

नयनताराः मला तर हे सगळं पोरकटपणाचं वाटतं --

ठाकूर : पण तुमच्या एक लक्षात आलं असेल की तुमच्या आवडत्या क्षेत्रातसुध्दा हम भी कुछ हैं !

जगदीपः कुठलं आवडतं क्षेत्र ?

ठाकूरः जाऊं द्या, सगळं पोरकटासारखं बोलत बसणं मलाही आवडत नाही.

जगदीपः बरं, मी निघू का आता ?

नयनताराः निघालास ?

ठाकूर : निघलात ?

जगदीपः हो, जातो आता..

नयनताराः मग परत कधी येणार आता ?

ठाकूरः निदान वर्षातनं एखादेवेळेला तरी येत जा हो ! नाहीतर असं करा नं -- मिसेसना घेऊन या तुमच्या ! (नयनताराला ) कशी आहे आयडिया ?

नयनताराः छान ! ये नं एकदा तिला घेऊन !

जगदीपः हो, येईन, पण ती जरा आजारी असते हल्ली ! येऊ ?

नयनताराः काय होतंय ! बोलला नाहीस ते ?

ठाकूरः औषधपाणी वेळच्या वेळी करा म्हणजे झालं ! बऱ्या झाल्यावर या घेऊन !

जगदीपः बरं, चलतो मी !

ठाकूरः या, या !

नयनताराः अरे, तुझा पत्ता नाही दिलास ?

जगदीपः हं, हो ! हे माझं कार्ड -- ( तिला खिशातून कार्ड काढून देतो. ) येतो मी --

नयनताराः अच्छा, ये पण - बघीन, मीपण तिची तब्बेत वगैरे बघायला येऊन जाईन - अच्छा !

जगदीपः ( बाहेर --) अच्छा ! ( तो गेल्यावर नयनतारा आत येते. ठाकूर नुसते तिच्याकडे पाहतात. )

ठाकूरः एक गोष्ट तुझ्या लक्षात आली का ?

नयनताराः ( जरा रागातच -- ) तुमच्या लक्षात येणारं सगळंच मी महत्त्वाचं समजत नाही.

ठाकूरः त्याच्या शर्टावर लिपस्टिकचा डाग होता आणि तो, तो सारखं लपवायचा प्रयत्न करत होता.

नयनताराः असेल ! पण माझ्याकडं आलेल्यांशी वागायची ही तुमची पध्दत मला आवडलेली नाही.

ठाकूरः इथं येण्याआधी तो कुठंतरी जाऊन आला असावा.

नयनताराः असेल ! पुन्हा कधी यावंसं वाटेल का कुणाला इथं !

ठाकूरः आणि काय योगायोग पहा -- तुझीही लिपस्टिक विस्कटलेली आहे --

नयनताराः शक्यच नाही ! काय डोकंबिकं फिरलंय का तुमचं ! संशयाचं भूत झालाय तुम्ही ! स्वतःच्या बायकोचा संशय घेता ! लाज वाटली पाहिजे ! दोन महिनेसुध्दा नाहीत झाले अजून आणि हा संशयीपणा ! शी !

ठाकूरः संतापू नकोस. आपल्याच हार्टवर परिणाम होतो त्याचा ।

नयनताराः खड्ड्यात गेलं ते माझं हार्ट ! अवघड आहे तुमच्याशी संसार करणं !

ठाकूरः हे बघ. जास्त संतापायचं काही कारण नाही. चांगलं वागणाऱ्यांचे संसार सुखाचे होतात कारण ते सावध नसतात. एका व्यक्तीचं वागणं जरा वेगळ्या मार्गानं चाललं तरी दुसऱ्या व्यक्तीला ते कळत नाही कारण ती सावध नसते. मी स्वतः मुळात चांगलं वागणारा नाही. त्यामुळं मी सावध राहणार ! कळलं !

नयनताराः शी ! काय घाणेरडं तत्त्वज्ञान हे ! फसले मी !

ठाकूरः कुणाला काय बोलतीयस हे जरा लक्षात घेऊन बोल ! माझ्या संयमाची परीक्षा घेऊ नकोस !

नयनताराः ( आणखी संतापून --) काय कराल ? मारून टाकाल मला ? मारा ! ( ठाकूर पाहात उभे ) माझे मित्र,

मैत्रिणी माझ्याकडे येणार ! मी असल्या तुरुंगात राहणार नाही ! आणि ऐकून ठेवा ! मला माझा कधीही संशय घेतलेलं चालणार नाही ! जगदीप आणि मी इथं घरात असलो आणि दरवाजा आतून बंद असला तरी ! कळलं !

ठाकूरः ( काही क्षण पाहून -- ) बरं, बरं, चल ! जास्त चिडाचिड नको ! बास ! बरं, आता पाणी घेऊन ये जरा मला प्यायला --( ती पाहते. संताप थोडा सैल सोडते आणि आत जाते. ठाकूर बसतात. पाय पसरून रिलॅक्सड् बसतात. काही क्षण जातात... स्वतःशी हसतात... ) मला लाईफ शिकवतोय ! च्यूत्या साला !!... ( अंधार होत जातो...)

## दृश्य दुसरे

( पुन्हा प्रकाश पडतो तेव्हा जगदीपचे घर. जगदीप घरच्या कपड्यांत वर्तमानपत्र चाळत बसलेला -- प्रवेशव्दार दिसेल अशा अँगलने. दरवाजा दघडा. तो मधेच घड्याळाकडे पाहतो. पुन्हा वर्तमानपत्रात. काही क्षणांनी त्याची बायको संध्या -- २५ -- येते. दार लावून घेते. तिचा पोषाख साधा. चष्मा. पण जरा सुंदरच. ती हातातल्या वस्तू ठेवते, बसते. जरा हाशहुश्श करते. जगदीपकडे जणू लक्ष नाही.)

जगदीपः बराच उशीर झाला ?

संध्याः थांब जरा. एकदोन मिनिटं बसते स्वस्थ आणि मग देते उत्तरं सगळी. पण तुला काळजी वाटण्यासारखं काही नाहीय !

जगदीपः मला ? काळजी कसली ?

संध्याः थांब जरा,दोन मिनिटं कळ काढ. मी तरी तुझ्या मनाची किती काळजी घेणार ? एवढा वेळ सहन केलाच आहेस नं माझा उशीर ! आणखी दोन क्षण !

जगदीपः सहन कशाला ? सहज विचारलं !

संध्याः तुझं ' सहज ' माहिती आहे मला ! उलट माझं सगळं ' सहज ' असतं आणि तुझ सगळं परिश्रमपूर्वक असतं ! पण तुला वाटतं की माझं सगळं प्रयत्नपूर्वक चाललंय सारखं ! माहितीय मला ! ' सहज ' म्हणे ! सारखं आपली बायको हरवतीय का तिला कुणी पळवून नेतंय हाच विचार ! तुला सोडून मी कुठ्ठं जाणार नाही ! आणि जाणार तरी कुठं ? आहे ते ठीक आहे !

जगदीपः मला तर ही माझ्या, तुझ्यावरच्या प्रेमाची चेष्टा वाटते ! ( संध्या काही क्षण डोळे मिटून बसते. स्वस्थ.)झाली का विश्रांती ? असा आळशीपणा उपयोगी नाही. पटापट विश्रांती घेऊन कामाला लागलं पाहिजे माणूस ! काय !

संध्याः हं, बोल.

जगदीपः नाही, मी म्हणत होतो की तुला ऑफिसातून यायला आज उशीर का झाला ?

संध्याः सेक्स हा विषय सोडून ही शंका आहे का ? की एक अंदाजे तपासणी चाललीय ?

जगदीपः म्हणजे काय ? साधी चौकशीही करू नये ?

संध्याः मला अक्षरशः किळस येते. सारखे सेक्सचे विचार ! तुझेच असं नाही -- जवळजवळ सगळ्यांचेच !शी ! म्हणून मी ऑफिसातसुध्दा जरा फटकूनच राहते -- वागते सगळ्यांशी ! स्त्री असो, पुरुष असो -- हेच सारखं डोक्यात ! शी !

जगदीपः मी एका ठिकाणी असं वाचलंय की किळस हे आकर्षणाचंच दुसरं रूप असतं. मुळात यात काही फरक नसतो.

संध्याः मला एवढं अवघड काही कळत नाही. आणि मला तसल्या अवघड गोष्टींची आवडही नाही. गरजही नाही त्याची. आणि मुख्य म्हणजे असलं काही ऐकलं की त्रासिक वाटतं मला. किळसवाणंच वाटतं !

जगदीपः मी नुसतं साधं आपलं एक सांगितलं - त्याच्यावर इतकी वाक्यं !

संध्याः साधं नव्हतं ते !

जगदीपः एवढी सगळी अवघड वळणं घेण्यापेक्षा 'उशीर का झाला ' या साध्या प्रश्नाचं साधं सरळ उत्तर देता आलं असतं तुला.

संध्याः आमच्या ऑफिसातला जयकुमार माझ्या बोलण्यातून ऐकून तरी तुला माहिती आहेच-- त्याच्या घरी गेले

होते. घरची परिस्थिती चांगली श्रीमंतीची आहे, पण गरीब आहे बिचारा ! तोही ऑफिसात कुणाशी फारसं बोलत नाही ! आपलं काम बरं, आपण बरं -- या पध्दतीनं राहतो बिचारा ! घरी एकटाच असतो ! अजून लग्नबिग्न काही झालेलं दिसत नाही बिचाऱ्याचं !

जगदीपः सगळ्या सुखात न्हाऊन निघतोय बिचारा !

संध्याः एखाद्या साध्या माणसाची अशी चेष्टा करू नये. ऑफिसात असताना आम्ही मधनंमधनं कॉफी प्यायला एकत्र जातो नं, तर आज तो म्हणाला, माझ्या घरी चला, घरच्या कॉफीची चव घ्या. कॉफी खरंच छान केली होती त्यानं !

जगदीपः पण काय विशेष ?

संध्याः काही नाही, सहज !

जगदीपः आईवडील, भाऊबहीण कुणीच नाही ?

संध्याः उत्तरप्रदेशात कुठंतरी असतात म्हणाला. आणि कशाला आपण दुसऱ्याच्या खाजगी गोष्टीत जास्त खोलात जायचं ?

जगदीपः ते बरोबर आहे. आणि पध्दतशीर नोकरी करतोय म्हणजे खरंही असेल म्हणा ! हा एकटाच इकडं आला म्हणजे !

संध्याः एकटाच राहतोय, पण घर अगदी पॉश आहे. आपलं काहीच नाही त्याच्यापुढे !

जगदीपः गरीब बिचारा !

संध्याः म्हणजे काय ?

जगदीपः तुला सांगू का, एखादं माणूस दुसऱ्याबद्दल फार सहानुभूती किंवा कीव दाखवायला लागलं ना की ते काहीतरी लपवणं चाललंय असं मला वाटतं !

संध्याः म्हणूनच एक लपवायचं, एक दाखवायचं असं वागणं नसावंच माणसाचं ! म्हणजे मग असं काहीतरी वाटण्याचा त्रास होत नाही.

जगदीपः मग सांग नं--एवढा इतका अगदी तुला बिचारा वाटावा असे कोणते खास गुण आहेत त्या जयकुमारमधे ?

संध्याः अरे, बिचारा असणं हाच एक गुण आहे नं !

जगदीपः इतका ? !

संध्याः कध्धी काही मनात नसतं त्याच्या ! साधा आहे अगदी !

जगदीपः आता मी तुझा नवरा आहे म्हटल्यावर माझ्या मनात असणारच नं !

संध्याः अंहं -- ते नाही -- एकूणच म्हणतेय मी !

जगदीपः आता हे मला कळत नाही ! मग हे साधं की अवघड ?

संध्याः माझं एखादं बोलणं लक्षात ठेवायचं आणि लगेच त्याची परतफेड करायची असं वागू नकोस--साधं वाग ! पोरकटपणा करू नकोस !

जगदीपः कसंही वागलं तरी चालतं -- प्रेम असणं महत्त्वाचं आहे !

संध्याः साधेपणातच प्रेम असतं.

जगदीपः मग आपलं आहे का एकमेकांवर -- प्रेम ?

संध्याः याबद्दल मला कधीच शंका वाटत नाही. आहेच मुळी !

जगदीपः आपलं एकमेकांवर प्रेम आहे आणि दुसरीकडं कुठंही अजिबात नाही असं खरं तर व्हायला हवंय ! मलाही बरं वाटेल !

संध्याः माझं तसंच आहे ! तुझं वेगळं आहे ?

जगदीपः वेगळं नाही--पण प्रेम असं वाढत वाढत जावं असं मात्र वाटतं ! आहे एवढंच बास असं मात्र वाटत नाही !

संध्याः करतानाच पूर्ण प्रेम करायचं रे म्हणजे मग वाढायचा वगैरे प्रश्नच येत नाही !

जगदीपः ते आहे म्हणा ! ( जरा नाराज. )

संध्याः बोलण्यात हरलास म्हणून नाराज होऊ नकोस ! आपण दोन नाहीच आहोत ! एकच आहोत !

जगदीपः म्हणूनच मी धन्य आहे !

संध्याः आपण दोघंही !

जगदीपः तेच !

संध्याः ते सगळं ठीक आहे, पण खरं -- तुझ्या मनातलं सांगू का ? मी कॉफी प्यायला जयकुमारच्या घरी का गेले ? मी किती वेळ तिथं होते ? आम्ही काय बोलत होतो ? घरात कुणीच नाही हे मला कधी कळलं ? त्यानं घरी बोलावल्यावर मी लगेच तयार कशी झाले ? तो दिसायला कसा आहे ? त्याचा आवाज, बोलणं कसं आहे ? दुसऱ्या कुणाशी तो फारसं बोलत नाही तर माझ्याशी कसं काय बोलतो ?-- या आणि अशा इतर प्रश्नांत तुला खरं तर इंटरेस्ट आहे ! सारखे सेक्सचे विचार मेले ! किळस येते मला !

जगदीपः असलं काहीच माझ्या मनात नाही असं म्हणायला भाग पाडतेयस तू मला -- एकदा जिंकत चाललं की जिंकत जातं माणूस ! याच्यावर आता प्रामाणिकपणा हा एकच उपाय दिसतोय मला ! ( क्षणभरानं -- ) खरंच हे प्रश्न आहेतच माझ्या डोक्यात !

संध्याः हे तुझं प्रेम !

जगदीपः हो, हेच माझं प्रेम ! पण सांग आता उत्तरं -- त्या प्रश्नांची !

संध्याः सारखे सेक्सचे विचार मेले ! शी ! ( उठून आत जाते. )

जगदीपः ( स्वतःशी --) शी, शी म्हणायची ही एक ट्रिकच आहे साली ! ( वैतागून बसतो. क्षणभरानं दारावरची बेल वाजते. तो उठणार एवढ्यात संध्या आतून येते आणि दाराकडे जाऊन दार उघडते. दारात ठाकूर आणि नयनतारा. ती अर्थातच त्यांना ओळखत नाही. ती अजूनही त्या वादाच्याच मूडमध्ये आहे.)

संध्याः कोण ?

ठाकूरः तुमच्याकडेच आलोय आम्ही.( जगदीप पाहतो. पुढे येतो.)

जगदीपः अरे वा, या,या ! बसा ! ( संध्याशी ओळख करून देत -- ) ही माझी पत्नी -- संध्या -- आणि संध्या, हे श्री.ठाकूर आणि या मिसेस नयनतारा ठाकूर -- या आणि मी कॉलेजात एकत्र होतो !

संध्याः हं ! आलेच ! ( आत जाते. )

नयनताराः इकडून निघालोच होतो, तर यांना आठवलं की तुम्ही इथे राहता -- भेटून येऊ म्हणाले !

जगदीपः आलोच ! ( आत जाऊ लागतो - )

ठाकूरः मिसेस नोकरी करतात वाटतं ! नुकत्याच आलेल्या दिसतायत ! एवढा उशीर होतो ?

जगदीपः नाही, आजच झालाय उशीर ! आलोच ! ( जातो. )

ठाकूरः ( बसत -- ) यांच्यात काहीतरी वाद झालेला असून तो बहुतेक आज झालेल्या उशीरामुळेच झालेला असावा ।

नयनताराः आपल्याला काय करायचेत हे अंदाज ?

ठाकूरः आपण तर सहज म्हणून आलोय ! सुरुवातच विचित्र झाली ! हा एक साधा रूटीन वाद असेल ?
( जगदीप आणि संध्या बाहेर येतात, ते काही बोलण्यापूर्वीच--) कशी काय आता यांची तब्बेत ? तुम्ही आमच्याकडे आलात तेव्हा या आजारी होत्या.

संध्याः मला काय झालंय ? ( मूड अजून तोच.) चांगली ठणठणीत आहे मी ! कधी आजारी होते मी ?
(जगदीपला-- ) काय रे ?

जगदीपः असं म्हणालो होतो मी ? तरी चारसहा महिने झाले असतील आपल्या भेटीला !

नयनताराः हो, झाले असतील --

जगदीपः काही आठवत नाही -- पण -- ( नयनताराकडे पाहून फक्त ठाकूरना --) दिवस होते ना ?

ठाकूरः कुठलं काय, बोलून गेलो झालं त्यावेळी ! चारसहा महिने झालेच की त्याला !

जगदीपः हो, हो -- एकच ते ! सगळं ओके असलं की सावधपणा जरा जास्त लागतो !

संध्या : फालतूगिरी काहीतरी ! ( ठाकूरना --) तुम्ही चहा घेणार की कॉफी ?

नयनताराः मी कॉफी घेते.

ठाकूरः मलाही कॉफी चालेल --

जगदीपः छान ! चहापेक्षा कॉफी कधीही चांगली !

ठाकूरः ( जगदीपला --) आलो की नाही आम्ही न बोलावता ?

जगदीपः मी कार्ड दिलं होतं !

नयनताराः गंमत रे !

ठाकूरः आम्ही उद्या चाललोय पिकनिकला माथेरानला -- येणार का ?

जगदीपः नाही, सध्या जरा कामाचे प्रॉब्लेम्स आहेत --

ठाकूरः मग संध्या वहिनी ?

संध्याः मलाही नाही जमणार -- ( आत जाते. )

ठाकूरः ठीक आहे -- फिर कभी !... आमच्या नयनला जुन्या गोष्टींची भारी आवड ! तुम्ही गेल्यावरसुध्दा कॉलेजातल्या जुन्या मित्रमैत्रिणी वगैरे याच मूडमधे होती ती ! मीही ऐकत होतो. ( जगदीप साशंकपणे पाहतो.)

नयनताराः गेले ते दिवस ! ( जगदीपला -- ) नाही का रे !

जगदीपः हो नं !

नयनताराः आज रजा घ्यायला लावलीय यांना !

जगदीपः अरे वा !

नयनताराः ( जगदीपला --) तुझा कसा काय चाललाय व्यवसाय ? आणि इतर अभ्यास ?

जगदीपः आहे आपलं, ठीकाय !

ठाकूरः अभ्यास कसला ?

जगदीपः जाहिरातींसाठी हो -- उगीचच नॉलेज ठेवावं लागतं -- भारतात एनर्जी ड्रिंक्स किती आहेत, त्यातली कोकोबेस, नॉनकोकोबेस कोणती --आयुर्वेदिक टूथपेस्टमधे ही का चालली नाही आणि ती का प्रचंड चालली, वगैरे --

ठाकूरः असेल, असेल --

जगदीपः सारखं कल्पनाशक्तीला खाद्य तर जमवत राहिलंच पाहिजे ! कुठलीही कपॅसिटी न वापरता पडून राहू नये !

ठाकूरः आम्हाला मात्र कल्पनाशक्तीच्या क्षेत्रातून लौकरात लौकर वास्तवात येणं आवडतं ।

जगदीपः मी कुणाला आव्हान देत नाहीय ! प्रत्येकाच्या वेगवेगळ्या स्टाईल्स असतात ! स्वधर्मे निधनम् श्रेयः !

नयनताराः ए S संस्कृतपण येतं तुला ? ( हसते आणि आत जाते.)

ठाकूरः मला वाटतं, आम्ही लौकरात लौकर जावं इथून --

जगदीपः का ? बसा हो !

ठाकूरः आपला दुर्गुण माहीत आहे तुम्हाला ! अंदाजांची साखळी ! उगीच नकोच ते ! तुम्हीसुध्दा फारसे मजेत दिसत नाही आहात !

जगदीपः नाही, तसं काही नाही -- ( नयनतारा आणि संध्या येतात. संध्याच्या हातात कॉफीच्या चार कपबशा असलेला ट्रे. नयनतारा बसते. संध्या प्रत्येकाला कॉफी देते. )

ठाकूरः ( संध्याला -- ) वहिनी, तुमचा हात पाहून सांगतो, तुम्ही रांगोळ्या घालाल तर मोठ्या घालाल -- बारीक नक्षीकाम तुम्हाला आवडणार नाही -- मोठी कामंच आवडतात तुम्हाला --

संध्याः ( मूड बदलत --) अय्या, खरंच -- भविष्य सांगता तुम्ही ? माझं सांगा नं ! दाखवू ?

ठाकूरः नाही -- हात सकाळीच पाहावा, रात्रीच्या दिव्याच्या उजेडात पाहू नये -- हा नियम फार तर मोडेन मी तुमच्यासाठी -- पण दुसरा नियम आहे -- हात पाहताना तिथं तिसरी व्यक्ती नसावी -- हा नियम मात्र मी मोडत नाही.

संध्याः का ?

ठाकूर आता ' का '? अहो, एकदा, एकानं, असा चारचौघांत हात पुढे केला आणि सांगा म्हणाला, तर लगेचच दिसणारी गोष्ट म्हणजे त्याच्या शुक्र उंचवट्यावरचा काळा ठिपका -- आता त्याला मी सांगावं का सगळ्या लोकांत की बाबा, गुप्तरोगापासून जप म्हणून ! ?

संध्याः माझं तसलं काही असणंच शक्य नाही !

ठाकूरः तेच असं नाही हो, प्रत्येकाचं थोडंफार तरी फक्त स्वतःलाच माहीत असलेलं असं जगणं असतंच नं ! इट इज नॉर्मल !

संध्याः मला नाही असलं काही कळत ! आणि सेक्स या विषयाकडं तुमचा रोख असेल तर मला किळस आहे त्याची !

ठाकूरः छे, छे, तसलं काहीच म्हणायचं नव्हतं मला !

संध्याः पण छान ओळख झाली आपली आज ! खरं तर मला फारसं बोलता येत नाही कुणाशी पण तुम्ही दोघं

छान -- प्रसन्न, निरागस वाटता !

जगदीपः निरागस ? लहान मुलं आहेत का ती ? हल्ली भाषेचा सेन्सच राहिलेला नाही कुठे ! बरोबर शब्द वापरणं, योग्य ठिकाणच्या आघातांनी बोलणं हे खलासच झालंय !

ठाकूरः त्यांना ' चांगलं ' म्हणायचंय एवढं लक्षात घ्यायचं हो !

जगदीपः आज पहिल्यांदाच वापरला तिनं तो शब्द !' निरागस ' ! ( ठाकूर खिसे चाचपतात. सिगरेट्स् संपल्याचं लक्षात येतं. )

ठाकूरः मी जरा सिगरेट्स् घेऊन येतो हं -- आलोच दोन मिनिटांत --

नयनताराः नाही ओढली थोडा वेळ तर काय होईल ?

ठाकूरः आलोच ! ( जातात. संध्या क्षणभरानं कपबशा ट्रेमधे घेऊन आत जात -- )

संध्याः प्रसन्न आणि निरागस -- हे बरोबरच आहे ! आलेच हं -- ( आत जाते.)

जगदीपः मुद्दाम कसं म्हणाली पाहिलंस ना !

नयनताराः तेवढं तर होणारच रे ! पण तू असा दबून का वागतोयस ?

जगदीपः तुम्ही यायच्या आधी आमचा जरा दुसरा काही विषय चालला होता. त्याचा परिणाम आहे हा -- एका साईडला डोक्यात तेच चालू आहे -- अर्थात् ठाकूर बरोबर नसते आणि नुसत्या आपल्यातच गप्पा मारायच्या असत्या तर मी ते विसरू शकलो असतो --

नयनताराः त्यांची काहीतरी अंदाजांची साखळी चालू झालीय म्हणत होते -- त्यातनं काही निघालं बिघालं तरी मनावर घेऊ नकोस -- संध्या मला तरी छान वाटतेय -- पण तुला माझ्या शिवाय थारा नाही असं होऊ देऊ नकोस --

जगदीपः बरं होईल असं एकदाचं काही सापडलं तर ! ( सावरत --) म्हणजे तसं नव्हे -- पण तरी नवरा बॉक्सर आहे तुझा -- ते मुख्य कसं विसरणार ?

नयनताराः अरे पण माझी काही तक्रार असल्याशिवाय बॉक्सिंगचा उपयोग करतील का ते ?

जगदीपः पण समजा काही कारणानं चिडून दिला एक त्यांनी मला असा गुच्चा ठेवून आणि पडले माझे दात तर पुढं काय करणार ? तुझ्या नवऱ्याविरुध्द मी तक्रार करायची ? कुठं ? त्याच्याच डिपार्टमेंटकडं ? आणि तुझ्याच नवऱ्याविरुध्द मी भांडतोय म्हटल्यावर तुला त्याच्या विरुध्द बोलता येईल ? नाईलाजानं का होईना पण तू राहणार सलामत, पण माझे दात ?

नयनताराः पण असं चिडायला कारणच द्यायचं नाही ना !

जगदीपः ते आहे, पण असे सगळे विचार असतातच !

नयनताराः म्हणजे असलं काही तरी वागायचं तुझ्या मनात होतं ? ! बापरे ! मलाही काळजीच घ्यायला हवी म्हणजे ! ( संध्या येते.) मला वाटलं बराच काळ तुम्ही इथं राहताय !

जगदीपः वर्ष झालं फक्त !

संध्याः यानं कार्ड दिलं होतं तर तुम्ही फोनबीन नाही केलात कधी ?

नयनताराः मला भीती होतीच तुम्ही असं विचाराल याची ! आरोप बिनशर्त मान्य !

संध्याः आपल्या मनात काही नसलं म्हणजे झालं हो ! भीती कसली ! ( ठाकूर येतात. )

ठाकूरः ( संध्याला-- ) खरं सांगतो, तुम्ही समजताय इतके आम्ही चांगले आहोत का ही मला तरी शंका आहे आणि ती तुम्हाला न सांगणं म्हणजे तुमची फसवणूक होईल !

संध्याः बघितलं की कळतं !

जगदीपः स्पष्टच म्हणजे सगळ्यांच्या डोक्यांत सतत सेक्सचेच विचार असतात असं तिचं म्हणणं असून त्याची तिला किळस आहे -- तुम्ही तसे नाही असं म्हणायचंय तिला !

ठाकूरः ( संध्याला -- ) पण तुम्हाला जे काय वाटलं त्याला अजिबात बाध न आणता आणि नम्रपणानं आणि शिवाय खरेपणानं मी असं म्हणेन की तुम्ही सुंदर आहात !

संध्याः सुंदर म्हणा हो. आणि आहेच मी तशी. मनात काही नसलं म्हणजे झालं !

ठाकूरः तसं असतं तर माझ्या बायकोसमोर कसं बोलू शकलो असतो मी ?

नयनताराः खरंच छान दिसता तुम्ही !

ठाकूरः आम्ही कसले निरागस, तुम्ही निरागस !

जगदीपः मी जेव्हा नयनला म्हणजे नयनताराला सुंदर म्हणतो तेव्हा माझ्याही मनात काही नसतं !

ठाकूरः म्हणालात काय तुम्ही असं कधी तिला ? आणि नयन म्हणता म्हणता नयनतारा असं सावरून घेतलंत हे ठीकच झालं !

जगदीपः समजा म्हणालो तर असं म्हणतोय मी !

नयनताराः म्हण रे ! त्यानं काही बिघडत नाही !

संध्याः आमच्या ऑफिसात एक जयकुमार नावाचा माणूस आहे.( ठाकूरना --) तुमच्या सारखाच छान आहे अगदी ! बाकीच्यांशी मी बोलतही नाही ! सारखे सेक्सचे विचार मेले डोक्यात ! शी ! साधं, सरळ वागणं नाहीच !

जगदीपः मला नं कधीकधी असं वाटतं की खरंखोटं समजायची वाट न पाहता, आलंय ना मनात म्हटल्यावर एऽक खाडकन देतात ठेवून ना काही लोक, त्यांचं बरोबरच असतं एका दृष्टीनं !

नयनताराः अरे, अरे, ( ठाकूरांकडे पाहून पण बेफिकीरीनं जणू मुद्दाम जगदीपजवळ जाऊन बसत--) असं म्हणून नये ! असं बोलल्यानं तुझा सुंदरपणाही कमी नाही का होत ? आणि तू तर वकील आहेस ! खऱ्याचं महत्त्व माजवणं कित्ती महत्त्वाचं असतं हे काय तुला सांगायला हवंय ?

जगदीपः खरं शोधणाऱ्याला जिथं कधीच पोचता येत नाही असं खरं !

नयनताराः म्हणूनच तर खरं तर ' खरं ' महत्त्वाचं असतं ! आणि कुणीही अंदाजानं वागणं वाईट असंच आपलं मत असायला नको का ?

जगदीपः तेही बरोबर आहे म्हणा !

ठाकूरः पटलं तर मग !

संध्याःः ' खरं ' त्याला जरा उशीरा पटतं ! आता हेच पहा नं -- ( नजरेत राग -- ) ही दोघं इथं बसली आहेत --(ठाकूरना -- ) तुम्ही तिथं उभे आहात -- तिथंच थांबा -- ( जगदीप - नयनतारा प्रेक्षकसन्मुख आणि ठाकूर पाठमोरे. संध्या जणू मुद्दाम उठते आणि येऊन ठाकूरांना आलिंगन दिल्याच्या पोझमधे उभी राहते -- हात ठाकूरांच्या पाठीवर घेते.) अशी जरी मी येऊन उभी राहिले तरी काही नाही -- मन स्वच्छ पाहिजे --( हातांच्या बोटांनी ठाकूरांच्या पाठीवर उत्तेजक हालचाली करते. त्या अर्थात नयनतारा, जगदीप यांना दिसत नाहीत. ठाकूरांना -- ) आहे ना हे मनात काही नसणं ?

ठाकूरः ( बाजूला होत --) प्रश्नच नाही -- ( संध्याचं वागणं ही आपल्या वागण्याला प्रतिक्रिया आहे हे ओळखून नयनतारा उठून बाजूला जाते. )

संध्याः आणि मघाशी तुम्ही म्हणालात तसं -- मनात असतं तर सगळ्यांच्या समोर वागूच शकले नसते मी अशी --

ठाकूरः वन्हि तो चेतवावा रे -- चेतवीताचि चेततो -- हे कुणाचं आहे ?

जगदीपः हे असलं सगळं रामदासांचं असतं -- ब्रम्हचारी होते ते -- प्रयत्नपूर्वक वागल्यावर काहीही कसं साध्य होऊ शकतं ते सांगायचे ते --

ठाकूरः पण यांनी ( संध्याकडे निर्देश. ) खोटं पाडलं ते ! मनातच नसल्यावर -- खरंच --लव्हली ! मनातच काही ठेवायचं नाही ही आयडिया खरोखर अव्दितीय आहे --

जगदीपः युनिक म्हणा नं मग !

ठाकूरः तेच ! खरोखर !

जगदीपः एखाद्या निरुपयोगी गोष्टीनं एवढं कुणी उल्हसित होत नाही -- बहुतेक उपयोगी असावी ती आयडिया -- तरी मी उल्हसित म्हटलंय -- उत्तेजित म्हटलेलं नाही --

ठाकूरः भाषेवर खरोखर तुमचं प्रभुत्वच आहे -- शब्दांचा वापर करेक्ट अगदी --

जगदीपः शब्द बापुडे पोकळ वारा -- हे तुकारामांचं आहे -- ते ब्रम्हचारी नव्हते -- संसारी होते --

ठाकूरः तुम्हाला खरोखर हे सगळं माहीत आहे की कुणाच्याही नावावर काहीही खपवताय तुम्ही ? माझा काही एवढा अभ्यास नाही --

जगदीपः अहो तुम्ही तर कुलगुरू ! तुमचा अभ्यास नाही ?

ठाकूरः नाही, खरंच ! मनात नसलं तरी मलाच उलट दबल्यासारखं झालं -- हिच्यासमोर ! (नयनताराकडे निर्देश.)

नयनताराः असं, चारचौघांत, मिनिटभरात काही होऊही शकत नाही --

जगदीपः आणि मला काय वाटलं ते मी बोलूच शकत नाही ! मन अस्वच्छ आहे माझं !

संध्याः ( ठाकूरना --) आलं ना लक्षात -- हे असं आहे सगळं -- निष्कारण छळ नुसता !

नयनताराः ( संध्याला --) जाऊं द्या -- तुमचं घर पाहू नं जरा --

संध्याः हो, चला नं --( ठाकूरना --) येताय ?

ठाकूरः नाही, या तुम्ही. ( त्या दोघी जातात. जगदीपला --) त्यांच्या मनात काही नाही हे त्यांनी कृतीनं दाखवलं तसं तुमच्या मनात राग आहे हे तुम्ही कृतीनं का दाखवलं नाही ?

जगदीपः म्हणजे काय उठून मुसकाडीत द्यायची एक ठेवून का काय ! आणि कशासाठी ? तुम्ही सगळे चांगले हे सिध्द झालेलं असताना ! उगीचच तमाशा करायचा ?

ठाकूरः ते आहे म्हणा ! पण सगळीकडेच अशी विचारपूर्वक वागण्याची पध्दत उपयोगी पडत नाही असं मला वाटतं -- ठीक आहे -- पण तुमचा प्रॉब्लेम आलाय माझ्या लक्षात --

जगदीपः कसला प्रॉब्लेम ?

ठाकूरः हेच -- सेक्सला ' शी घाण ' म्हणणं !

जगदीपः छे, छे, त्यामुळं आमच्यात असा काहीच प्रॉब्लेम नाहीय -- आम्हाला तशी मजा येते -- त्यात तसा प्रॉब्लेम नाही -- सेक्सबद्दलची तशी पूर्ण किळस नाहीय ती ! आणि हे मला माहीत असल्यामुळंच मला ती किळस खोटी वाटते ! आमचंही सगळं बिघडलेलं असतं तर मग तिला खरंच किळस वाटते याच्यावर माझा विश्वास बसला असता !

ठाकूरः म्हणजे तुमच्यात सगळं चांगलं आहे हाच खरा प्रॉब्लेम आहे !

जगदीपः ती किळस मला खोटी वाटणं हा ! ( त्या दोघी एकीकडून येतात आणि दुसरीकडे जातात.)

ठाकूरः माझ्या एकूण लक्षात आलेलं एक सांगतो -- जगणं म्हणजे मनाचं खरचटत व्यग्र असणं -- मग विषय कुठलाही असो -- अमुक घडावं, अमुक टिकावं, तमुक संपावं आणि ढमूक घडू नये -- या चार प्रकारांत हे खरचटणं सतत चालू असतं -- आणि पाचवं म्हणजे हे खरचटणं थांबेल की काय ही या चारही प्रकारांत कॉमन असणारी भीती ! बस् ! जगण्याचा सारांश हा एवढाच ! ( त्या दोघी येतात. ठाकूर डबल सोफ्यावर बसलेले -- त्यांच्या शेजारी संध्या बसते. जगदीप सिंगल सोफ्यावर. नयनतारा दुसऱ्या सिंगल सोफ्यावर बसते.)

नयनताराः मस्त आहे घर तुमचं !

संध्याः अहो, हे तर काहीच नाही -- मी आज जयकुमारकडे गेले होते ना, तर तो तर एकटाच राहात असूनसुध्दा कसलं ' पॉश ' ठेवलंय त्यानं घर !

जगदीपः मला असले लोक बनावट वाटतात !

संध्याः दृष्टी तशी सृष्टी !

ठाकूरः ( संध्याला -- ) तुमच्या तुमच्यातले टोमणे जाऊं देत पण मोजकंच आणि समर्पक बोलता तुम्ही !

संध्याः ( नयनताराला --) तुम्ही एका कॉलेजात होता तर तेव्हा कसा होता हा ? ( जगदीपकडे निर्देश. )

नयनताराः चांगलाच होता !

संध्याः मित्रमैत्रिणी भरपूर असतील !

नयनताराः मित्र कमी, मैत्रिणी जास्त ! मीही होते त्यातली एक ! मजा यायची ! चावट ज्योक्स सांगायचा तो आम्हाला !

संध्याः शी ! आणि सांगताय हे तुम्ही ! !

नयनतारा अहो काळ असतो तो !

संध्याः काळबीळ काही नाही -- काय बदल झालाय याच्यात आता तरी ?

जगदीपः ( नयनताराला --) ए, काहीतरीच काय सांगतेस ! ठाकूरना काय वाटेल !

ठाकूरः माझ्या अंदाजांत फारशी नवीन भर पडतेय असं नका समजू तुम्ही !

नयनताराः ते तसले बुरसट विचारांचे नाहीत ! फ्री आहेत ! तसले असते तर ऊठसूठ प्रत्येकाला ठोसे लगावत बसले असते ते ! पण लोक त्याला वेडेपणा म्हणतील हे कळतं त्यांना !

ठाकूरः माझ्याकडे बॉक्सिंगची कला असून बऱ्याच वेळा ती व्यक्त न होता पडून राहते ! मला भीती एवढीच आहे की एकदम ती भरमसाट व्यक्त होऊ नये म्हणजे झालं !

संध्याः ( नयनताराला ) अजूनही तुम्हाला ते खटकत नाही -- तुम्ही सहज सांगताय !

नयनताराः खटकायचं काय त्यात ! लांबून नुसते ज्योक्स तर सांगत होता तो !

संध्याः शी !

जगदीपः हेल्दी फ्रेंडशिप म्हणतात त्याला ! ( नयनताराला -- ) जाऊं दे -- दुसरं काही बोलू --

ठाकूरः म्हणजे दोनापैकी एक निरागस कमी झाला -- आपलं, झाली !

संध्याः ( ठाकूरांच्या मांडीवर हात ठेवून --) तसं नाही हो -- चेष्टा नका करू -- माझा स्वभाव जरा वेगळा आहे इतकंच -- ( हात तसाच -- सगळे निरनिराळ्या प्रकारे अस्वस्थ.)

नयनताराः आल्यावर करता स्वैपाक वगैरे ?

संध्याः हो ना ! आमचं खरं जेवण रात्रीचंच ! रूटीन झालं पण आता ते !

नयनताराः जगदीप आणतो का भाजी वगैरे ?

संध्याः हा कसला आणतोय हो भाजी --( असं म्हणताना हात उचललेला -- ) भाजी, दूध, किराणामाल --हे सगळं मीच बघायचं ! ( पुन्हा हात तिथेच --)

नयनताराः अशी नका सवय लावू त्याला -- हळूहळू स्त्रीमुक्ती आणा जरा घरात -- निदान आठपंधरा दिवसातनं घराची स्वच्छता तरी करायला लावा -- पंखे कोण पुसतं ?

संध्याः ते मात्र तो करतो --( रडवेली होत --) पण माझी काही तक्रार नाही...काही तक्रार नाही माझी...( रडू लागते...) खूप चांगला आहे तो ...

जगदीपः ए, काय झालं ?

नयनताराः ( उठत --) काय झालं हो ? ( संध्या हमसून रडत एकदम ठाकूरांच्या गळ्यात पडते ...)

संध्याः मी जयकुमारकडे गेले होते पण माझी कसलीही चूक झालेली नाही ... तसं काहीच नाही ...आणि तरीही जगदीप...उगीचच...

ठाकूरः ( जगदीपला --) मग काय हो ? कशाला... उगीचच...?

नयनताराः ( जरा खोचकपणे --) तेच नं -- कशाला !

ठाकूरः ठीक आहे ...शांत व्हा तुम्ही ...( जगदीप दोन्ही हातांत डोकं धरून, मान खाली घालून बसलेला. नयनतारा जाऊन जगदीपच्या पाठीवर हात ठेवून उभी......ठाकूर आता -- संध्याच्या डोक्यावर हात ठेवून पाहताहेत जगदीप -- नयनताराकडे ... तसंच--संध्याला --) शांत व्हा तुम्ही ...हं ...आलोच हं मी ...( तिला बाजूला करून उभे राहतात...) आता माझ्या अंदाजांच्या साखळीची एक पूर्ण गोष्ट होतेय...नक्कीच...( नयनतारा अजूनही तशीच उभी...पाहतेय...जगदीपही पाहू लागलेला...) आता माझ्या कलेचा उपयोग करायची वेळ आलीय जगदीप...( ते हाताचा ठोसा करून जगदीपच्या दिशेने येतायत हे पाहून नयनतारा मधे येते...)

नयनताराः काय आहे ? काय चाललंय हे ? कशासाठी ?

ठाकूरः नुसतं ( गुद्दा दाखवत --) असं टच करतो तिथं --तोंडावर -- किमान दोन दात तरी पडतील ---

नयनताराः का ? कशासाठी ? तुमच्या एखाद्या तात्पुरत्या संशयासाठी कायमचं नुकसान करायचं नाही कुणाचं -- ( जगदीप जरा घाबरलेला ...)

ठाकूरः दोन दात तरी पाडावेच लागतील आता --

नयनताराः ( मधे येत --) नाही, आधी माझे दात पाडा, मग त्याचे --( संध्या सावरते, डोळे पुसते, पाहते. मग केस मागे बांधण्यासाठी दोन्ही हात उंच मागे नेते ...)

संध्याः ( तसंच ---) काय झालं ठाकूर ? -- जाऊं द्या -- मी करतेय ना विनंती --

( ठाकूर तिच्याकडे पाहतात. त्यांचा गुद्दा हळूहळू सैल पडत जातो...क्षणभरानं पडदा पडत जातो...)

**समाप्त**



पत्ताः-: **चं.प्र.देशपांडे,**
३, स्नेहदीप अपा. वीर सावरकर मार्ग,
सहकारनगर नं.२, पर्वती,
पुणे - ४११ ००९.

**दूरध्वनीः** **२४२२ ७८४७. / २४२२७८४८. / ९३७१००५७७३.**